**श्रीक्षेत्र नांदेड येथे दि. ७ ते ९ फेब्रुवारी, २०१५ रोजी होणाऱ्या अखिल भारतीय मराठी संत साहित्य संमेलनाच्या स्मरणिकेमध्ये अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या जाहिरातीच्या खर्चास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रसिध्दी-२०१४/५४/प्र.क्र.१५/विघयो,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ४ फेब्रुवारी,२०१५

**संदर्भ :-** अध्यक्ष, वारकरी साहित्य परिषद, पुणे यांचे दि. ९/१/२०१५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

चौथे अखिल भारतीय मराठी संत साहित्य संमेलन दिनांक ७ ते ९ फेब्रुवारी, २०१५ या कालावधीत श्रीक्षेत्र नांदेड येथे होणार आहे. सदर संमेलनाच्या वेळी “संतकृपा” नावाची स्मरणिका प्रसिध्द करण्यात येणार आहे. सदर स्मरणिकेच्या हजारो प्रती छापल्या जात असून, अंदाजे १० लक्ष लोक या स्मरणिकेचे वाचन करतात. या स्मरणिकेमध्ये सामाजिक न्याय विभागाच्या अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या जाहिराती प्रसिध्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चौथे अखिल भारतीय मराठी संत साहित्य संमेलन दिनांक ७ ते ९ फेब्रुवारी, २०१५ या कालावधीत श्रीक्षेत्र नांदेड येथे होणार आहे. या संमेलनामध्ये प्रकाशित होणाऱ्या “संतकृपा” नावाच्या स्मरणिकेत अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध कल्याणकारी योजनांच्या जाहिराती प्रकाशित करण्यासाठी ₹ १५,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा लक्ष फक्त) इतक्या खर्चास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. याकरीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व सन २०१४-१५ या वर्षाकरीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक एन-३
२२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण
०१ अनुसूचित जातीचे कल्याण
००१ संचालन व प्रशासन
(०३)(०५)अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठीच्या योजनांना समाजकल्याण संचालनालयामार्फत व्यापक प्रसिध्दी देणे (२२२५३७२५)
२६ जाहिराती व प्रसिध्दी

४ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या आर्थिक,सामाजिक व शैक्षणिक विकासाच्या योजनांच्या जाहिरातींची निवड आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी आपल्या स्तरावर करावी व त्याबाबतची माहिती अध्यक्ष वारकरी साहित्य परिषद, पुणे यांना दयावी.

५. सदर मंजूर केलेली रक्कम याच प्रयोजनासाठी उपयोगात आणल्याची आयुक्त समाज कल्याण,पुणे यांनी पडताळणी करुन तसे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. हे आदेश महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम भाग पहिला उपविभाग - ३ च्या अ.क्र ४ परिच्छेद क्र २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०४१५०९२१३०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kaumudi Ravindra Margaj

Digitally signed by Kaumudi Ravindra Margaj
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kaumudi Ravindra Margaj
Date: 2015.02.04 15:19:38 +05'30'

**( कौ.र. मरगज )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
३) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
४) मा. मंत्री / राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अध्यक्ष, वारकरी साहित्य परिषद, पुणे.
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रसिध्दी विषयक निवड नस्ती (विघयो)